**मुख्य अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीने पदस्थापनेमध्ये अंशतः बदल करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एसएलएस १३१७/(३८२/२०१७)/आ (वर्ग-१)**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २७.०७.२०१८.

**वाचा** : जलसंपदा विभाग, शासन आदेश क्र.एलएलएस १३१७/(३८२/२०१७)/आ (वर्ग-१), दि.१४.०६.२०१८.

**शासन आदेश:-**

श्री. राजन रसिकलाल शहा यांना संदर्भीय आदेशान्वये सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने मुख्य अभियंता (स्थापत्य) पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येऊन, त्यांच्या सेवा मृद व जलसंधारण विभागामध्ये वर्ग करण्यात आलेल्या होत्या. तथापि, श्री. शहा यांच्या सविस्तर पदस्थापनेचे आदेश त्या विभागाकडून अद्याप निर्गमित करण्यात आलेले नाहीत.

२. आता, प्रशासकीय कारणास्तव महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने श्री. शहा यांच्या पदस्थापनेमध्ये अंशतः बदल करण्यात येत असून, बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार त्यांची पदस्थापना **मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प व गुण नियंत्रण, पुणे** या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

३. संबंधित अधिकाऱ्यांस नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास **doesttclass1.wrd@maharashtra.gov.in** या ई-मेल आयडीवर त्वरीत अवगत करावे.

४. संबंधित अधिकाऱ्यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेव (रजा) मधील नियम-३०(सी) नुसारर मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबधित

अधिकाऱ्यांस मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदर बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांच्याविरूध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधित अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यांनी मुख्य अभियंता (स्थापत्य) पदाची तदर्थ पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र. ३०३/का-१२, दि.१२.०९.२०१६ अन्वये कार्यवाही करण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२७१६२८०६३५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Jagdish Sajanikar

Digitally signed by Prashant Jagdish Sajanikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a8cd67058795ac5a961c2b41207cb6d24b79e17716af754c9fc40fd4145416f1, serialNumber=217003e42c820ec29c89162937f98929453cc6295b34f71ea285041053a66aa7, cn=Prashant Jagdish Sajanikar
Date: 2018.07.27 16:27:41 +05'30'

**(प्रशांत साजणीकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (जलसंपदा)/सचिव (लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. सचिव (मृद व जलसंधारण विभाग), मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, मृद व जलसंधारण, वाल्मी, औरंगाबाद.
८. सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
९. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१०. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
११. उप सचिव (जल-२), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. खाजगी सचिव, मा.मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
१३. खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
१४. संबंधित अधिकारी (कार्यालय प्रमुखामार्फत).
१५. संबधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१६. सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. कार्यासन आ(वर्ग-१) संग्रहार्थ.